मोटार वाहनांवरील प्रवेशकर विषयक
अभय योजना

[ॲम्नेस्टी स्कीम].

महाराष्ट्र शासन,
शासन निर्णय क्रमांक-इएनटी-१५९३/सीआर-१२२/९३/कराधान-१,
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ मार्च १९९७.

प्रस्ताविक:- महाराष्ट्रात वापरल्या जाणा-या तथापि इतर राज्यात नोंदणी करण्यात आलेल्या वाहनांना हुडकून जप्त करण्याची मोहीम विक्रीकर विभागाने हातात घेतली आहे व अशा अनेक गाडया आतापर्यन्त जप्त करण्यात आल्या आहेत. अशा गाडयांच्या मालकांना थोडी मुभा देण्याचे आश्वासन महाराष्ट्राचा १९९७-९८ चा अर्थसंकल्प विधानसभेला सादर करताना मा. मंत्री [वित्त] यांनी अर्थसंकल्पिय भाषणाच्या भाग-दोन परिच्छेद-५ अन्वये दिले आहे.

शासन निर्णय:-

१] महाराष्ट्र मोटर वाहन प्रवेशकर अधिनियम १९८७ खाली लागू होणा-या शास्ती व व्याजामध्ये सवलत देण्याच्या प्रयोजनासाठी राज्य शासन ही योजना [ॲम्नेस्टी स्कीम] जाहीर करीत आहे.

२. करपात्र असलेल्या मोटार वाहनांच्या मालकांनी आपल्या गाडयांवरील पूर्ण प्रवेशकर ३१ मार्च १९९७ पूर्वी भरला तर व्याज आणि शास्ती मिळून संबंधितांना केवळ ५०० रुपये भरावे लागतील.

३. मात्र मूळ कराची रक्कम व व्याज आणि शास्ती पोटी भरावयाची रक्कम ३१ मार्च १९९७ पूर्वी भरावी लागेल. १ एप्रिल नंतर अशा गाडया कोणतीही सवलत न देता जप्त करण्याची मोहीम अधिक जोरात जारी करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ दि. श्री. दीक्षित ]
विशेष कार्य अधिकारी.

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१] महालेखापाल [लेखा परीक्षा] एक, महाराष्ट्र, मुंबई.
२] महालेखापाल [लेखा परीक्षा] दोन, महाराष्ट्र नागपूर.
३] विक्रीकर आयुक्त [एडीएम-११ शाखा], महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१० [२० प्रती ].

कृ. मा. प.

४) संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) परिवहन आयुक्त, मोटार वाहन विभाग, मित्तल चेंबर्स नरीमन पॉईन्ट,
मुंबई [ ५ प्रती ].
६) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवड नस्ती, कराधान-१,
९) कराधान-२, कराधान-३, कराधान-४.